**महाराष्ट्र पशुसंवर्धन सेवा (गट-अ)**
**वेतनश्रेणी रु.१५६००-३९१००, ग्रेड पे ५७००**
**मधील सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन या**
**पदावर (सरळ सेवा भरती) नियुक्ती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्र: पसंप्र-२०१४/प्र.क्र.३१४/पदुम-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २८ ऑगस्ट, २०१८.

वाचा:- १. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१८६(१)(२)(४३)/१७८१/पंधरा-अ, दि.२६/७/२०१२,
२.शासन आदेश क्र. पसंप्र-२०१२/प्र.क्र.३९५/पदुम-१, दि.२७ सप्टेंबर-२०१२,
३. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१८६(१)(२)(४३)/१७५१/पंधरा-अ, दि.१७ जून, २०१७.

प्रस्तावना :-

सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन या संवर्गातील सरळ सेवेच्या कोटयातील रिक्त पदे नामनिर्देशनाने भरण्यासंदर्भात शासन पत्र दि.६/९/२००६ अन्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगास मागणी पत्र पाठविण्यात आले होते. सदर मागणी पत्रास अनुलक्षून आयोगाने त्यांच्या दि.१६ जुलै-२०१० व दि. २६ जुलै २०१२ च्या पत्रान्वये एकूण १५२ उमेदवारांची सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन (गट-अ) या पदावर नियुक्तीकरिता शासनाकडे शिफारस केली होती. त्यास अनुलक्षून शिफारस पात्र उमेदवारांना शासन आदेश दि. ०६/५/२०११, दि.३१/५/२०१२, दि.२७/९/२०१२, दि. ०९/१/२०१३ व दि. ०४/७/२०१३ अन्वये सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन (गट-अ) या पदावर पदस्थापना देण्यात आली आहे.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या उपरोक्त शिफारशीच्या अनुषंगाने डॉ. नीता गोडबोले यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ-नागपूर येथे मूळ अर्ज क्र. ६६२/२०१२ दाखल केला होता. सदर प्रकरणात मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ-नागपूर यांनी दि. ६ जानेवारी, २०१७ रोजी अंतिम आदेश पारीत करुन महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने यापूर्वी सादर केलेली निवड यादी सुधारीत करुन सदर यादी शासनास सादर करण्याचे व आयोगाकडून सुधारीत शिफारस यादी प्राप्त झाल्यानंतर शासनाने आयोगाच्या अभिप्रायानुसार शिफारसपात्र उमेदवारांना सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन (गट-अ) या पदावर नियुक्ती देण्याबाबत निर्देश दिले आहेत. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ-नागपूर यांच्या दि.०६/१/२०१७ च्या आदेशाविरुध्द मा. उच्च न्यायालयात अपिल याचिका दाखल करण्यास प्रकरण योग्य नसल्याचे अभिप्राय सादरकर्ता अधिकारी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ-नागपूर यांनी त्यांच्या दि. ३१/१/२०१७ अन्वये दिले आहे.

३. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर यांनी दि. ६ जानेवारी २०१७ रोजी दिलेल्या आदेशानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांच्या दि. १७/६/२०१७ च्या पत्रान्वये १५२ उमेदवारांची सुधारीत यादी शासनास सादर केली आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांच्या दि.१७/६/२०१७ च्या पत्रान्वये शिफारस केलेल्या व नव्याने पात्र ठरलेल्या उमेदवारांना नियुक्ती देण्यात येऊ नये, या कारणास्तव डॉ.निता गोडबोले व इतर यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई व डॉ. संजय खाचणे यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद येथे अनुक्रमे मूळ अर्ज क्र. ७०४/२०१७ व ४९३/२०१७ दाखल केले आहेत. सदर प्रकरणांमध्ये मा.न्यायाधिकरणाने अनुक्रमे दि.२/८/२०१७ व दि.३१/७/२०१७ रोजी अंतरिम आदेश पारित करुन प्रस्तुत प्रकरणातील उमेदवारांना न्यायधिकरणाचे अंतिम आदेश होई पर्यत नियुक्ती देवू नये असे निर्देश दिले होते. दरम्यान सदर प्रकरणामध्ये डॉ. धर्माधिकारी व इतर यांनी मा. मॅट मुंबई येथे दाखल केलेल्या सकिर्ण अर्ज क्र. ३९३/२०१७ व डॉ. भागवत देशमुख व इतर यांनी मा. मॅट खंडपीठ औरंगाबाद येथे

किरकोळ अर्ज क्र. ४४८/२०१७ दाखल करुन प्रस्तुत प्रकरणी मा. न्यायधिकरणाने दिलेली स्थगिती उठवण्याची विनंती केली होती. सदर प्रकरणांमध्ये मा.मॅट मुंबई यांनी दि. १२/१०/२०१७ व मा. मॅट औरंगाबाद यांनी दि. २१/११/२०१७ रोजी अंतरिम आदेश पारीत करुन मा. न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून प्रस्तुत प्रकरणातील उमेदवारांना सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन या पदावर नियुक्ती देण्याबाबत निर्देश दिले आहेत. त्याप्रमाणे सादरकर्ता अधिकारी मा. मॅट मुंबई यांनी त्यांच्या दि. २१/११/२०१७ च्या पत्रान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांना मुळ अर्जाच्या अंतिम निकालाच्या अधिन राहून नियुक्ती देण्यास हरकत नाही असे अभिमत दिले आहे.

४. दरम्यान डॉ. संजय गायगवळी व इतर यांनी याच प्रकरणाच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ, नागपूर येथे रिट याचिका क्रमांक. ६४५०/२०१७ दाखल केली असता मा. उच्च न्यायालयाने दि. ९/१०/२०१७ रोजी अंतरिम आदेश पारित करुन मा. मॅट नागपूर यांच्या दि. ६/१/२०१७ च्या आदेशाच्या अनुषंगाने पुढील कार्यवाही करण्यात येवू नये असे निर्देश दिले होते. या प्रकरणी मा. उच्च न्यायालय खंडपीठ नागपूर यांनी दि.१०/७/२०१८ रोजी अंतिम आदेश पारीत करुन प्रस्तुत प्रकरणातील अशिफारसपात्र उमेदवारांना कमी करण्यात येणार नाही ही बाब विचारात घेऊन प्रकरण निकाली काढले आहे.

५. मा. मॅट मुंबई व मा. मॅट खंडपीठ औरंगाबाद याचे तसेच मा. उच्च न्यायालय खंडपीठ नागपूर यांचे परिच्छेद क्र. ३ व ४ मध्ये नमूद केलेले आदेश विचारात घेवून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांच्या नियुक्तीचे आदेश निर्गमित करण्यात आलेले नव्हते. तथापि मा.मॅट मुंबई यांचे दि. १२/१०/२०१७ व मा.मॅट खंडपीठ औरंगाबाद यांचे दि. २१/११/२०१७ चे अंतरिम आदेश तसेच मा.उच्च न्यायलय खंडपीठ नागपूर यांचे दि. १०/७/२०१८ चे अंतिम आदेश विचारात घेता मा.न्यायालयांच्या अंतिम निकालाच्या अधिन राहून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांना सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन या पदावर नियुक्ती देण्यास अडचण दिसून येत नाही.

६. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ-नागपूर यांनी दि. ६ जानेवारी २०१७ रोजी दिलेल्या आदेशानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांच्या दि. १७ जून २०१७ च्या पत्रान्वये १५२ उमेदवारांची सुधारीत यादी शासनास सादर केली आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने नव्याने सादर केलेल्या सुधारीत यादीनुसार यापूर्वी शिफारस पात्र ठरलेले २९ उमेदवार ना-शिफारसपात्र ठरत असून, २९ उमेदवार सुधारीत निवड यादीनुसार नव्याने शिफारस पात्र ठरले असून, सदर उमेदवारांना मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ-नागपूर यांच्या दि.०६/१/२०१७ च्या आदेशानुसार सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन (गट-अ) या पदावर नियुक्ती देणे आवश्यक आहे. नव्याने शिफारसपात्र ठरलेल्या २९ उमेदवारांपैकी डॉ. गडगे प्रकाश वामनराव व डॉ. पिंपरकर विनय अरविंद हे उमेदवार सेवानिवृत्त झाले आहेत तसेच डॉ. पाचरणे रमेश बाबुराव यांचे विरुध्द लाचलुचपत प्रकरणी गुन्हा दाखल झाल्याने त्यांना दि.२०/८/२०१८ च्या आदेशान्वये शासन सेवेतून निलंबित करण्यात आले आहे. त्यामुळे सदर ३ उमेदवार वगळता, उर्वरित २६ उमेदवारांना सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन (गट-अ) या पदावर नियुक्ती देणे आवश्यक आहे.

**<u>शासन आदेश :-</u>**

वरील वस्तुस्थिती विचारात घेता मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकण, मुंबई यांच्या दि.०६/१/२०१७ च्या आदेशानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या खालील विवरणपत्रांत नमूद २६ उमेदवारांची पशुसंवर्धन विभागात सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र पशुसंवर्धन सेवा (गट-अ) (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड पे ५७००) या पदावर महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण अटी व शर्ती) नियम-१९७९ मधील नियम ९ (४२) मध्ये विहित केलेल्या परिविक्षाधीन या संज्ञेच्या व्याख्येनुसार तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे. सदर नियुक्त्या हया महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांचे पत्र क्र.१८६(१ (२ ) (४३)/ १७८१/ पंधरा-अ, दि.२६/७/२०१२ व पत्र क्र. १८६(१) (२)(४३) १७५१/ पंधरा-अ, दि.१७ जून, २०१७ अन्वये सादर केलेल्या निवड यादी संदर्भात मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल मूळ अर्ज

क्र. ७०४/२०१७ (डॉ. निता गोडबोले) व मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ-औरंगाबाद येथे दाखल मूळ अर्ज क्र. ४९३/२०१७ (डॉ. संजय खाचणे) तसेच या प्रकरणी विविध न्यायालयात प्रलंबित प्रकरणाच्या अनुषंगाने मा. न्यायालयाच्या/न्यायाधिकरणाच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून करण्यात येत आहे.

१. सदर उमेदवारांना महाराष्ट्र महसूल विभाग वाटप नियमावली सन २०१५, दि.२८/४/२०१५, दि.१६/७/२०१५ व दि. १५/६/२०१७ मधील तरतूदीनुसार महसूल विभाग वाटप करुन, त्यांची पदस्थापना खालील विवरणपत्रांतील स्तंभ क्र. ६ येथे नमूद पदावर करण्यात येत आहे.

| अ. क्र. | गुणवत्ता क्रमांक | अधिका-याचे नाव | प्रवर्ग | वाटप केलेला महसूल विभाग | पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. |
| १ | ६० | डॉ. खान इर्शाद अहमद रहीम | खुला | अमरावती विभाग | जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी , जिल्हा परिषद, वाशिम |
| २ | ६४ | डॉ. धर्माधिकारी प्रशांत रमेश | खुला | पुणे विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त, कार्यालय, पुणे, जि.पुणे. |
| ३ | ६५ | डॉ. टिटमे जलिंदर काशिनाथ | खुला | नाशिक विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुवैद्यकीय सर्व चिकित्सालय, अहमदनगर |
| ४ | ७२ | डॉ. दुबे अमृतकुमार नरसिंहप्रसाद | खुला | औरंगाबाद विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुवैद्यकीय सर्व चिकित्सालय, जालना. |
| ५ | ७३ | डॉ.देशपांडे सचिन दत्तात्रय | खुला | पुणे विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, आयुक्त पसं कार्यालय, पुणे. |
| ६ | ७४ | डॉ. बिलोलीकर समीर चंद्रकांतराव | खुला | औरंगाबाद विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालपसचि धर्माबाद, जि.नांदेड |
| ७ | ७९ | डॉ. गायकवाड बळीराम बापूराव, | खुला | औरंगाबाद विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालपसचि सिल्लोड जि.औरंगाबाद |
| ८ | ८० | डॉ. बोरुले मधुकर साधू, | खुला | औरंगाबाद विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालपसचि, निलंगा , जि.लातूर. |
| ९ | ८२ | डॉ. तांबे अनिल सर्जेराव | खुला | पुणे विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालपसचि, इंदापूर जि. पुणे |
| १० | ८६ | डॉ. देशपांडे अरुण पुरषोत्तमराव | खुला | पुणे विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, जैवपदार्थ निर्मिती संस्था पुणे. |

| अ. क्र. | गुणवत्ता क्रमांक | अधिका-याचे नाव | प्रवर्ग | वाटप केलेला महसूल विभाग | पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. |
| ११ | ८८ | डॉ. लंघे राजेंद्र शिवाजी | खुला | कोकण १ | जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग |
| १२ | ९१ | डॉ. पवार लक्ष्मण दत्तात्रय | खुला | कोकण २ | जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे |
| १३ | ९५ | डॉ. देशमुख भागवत विश्वनाथराव | खुला | पुणे विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, जैव पदार्थ निर्मिती संस्था, पुणे. |
| १४ | ९६ | डॉ. कोराने उदय नारायणराव | खुला | नागपूर विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुवैद्यकीय सर्व चिकित्सालय, चंद्रपुर |
| १५ | ९७ | डॉ. कोलते मोहन विश्वनाथ | खुला | अमरावती विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालपसचि, मलकापूर, जि.बुलढाणा. |
| १६ | ९८ | डॉ. देशमुख विजय भास्करराव, | खुला | औरंगाबाद विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालपसचि, अहमदपूर, जि.लातूर. |
| १७ | १०२ | डॉ. बाबर प्रमोद वसंतराव, | खुला | पुणे विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालपसचि, अकलूज, ता.माळशिरस जि. सोलापूर |
| १८ | १०४ | डॉ. टोपले प्रफुल्ल भास्कर | खुला | नागपूर विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, विभागीय रोग अन्वेषण प्रयोगशाळा, नागपूर |
| १९ | १०६ | डॉ. भालेराव प्रविण वसंतराव | खुला | नागपूर विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, विभागीय रोग अन्वेषण प्रयोगशाळा, नागपूर |
| २० | १११ | डॉ.भोसले उदय दशरथ | खुला | पुणे विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, राज्यस्तरीय प्रशिक्षण संस्था गोखलेनगर, पुणे. |
| २१ | ११२ | डॉ.गुजराथी संजय रमणलाल | खुला | नाशिक विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालपसचि, चोपडा, जि.जळगांव. |
| २२ | ११३ | डॉ.आर्ले बंकट कचरु | खुला | कोकण २ | जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड |
| २३ | ११४ | डॉ. होन बाळासाहेब पांडूरंग | खुला | नाशिक विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालपसचि, येवला, जि.नाशिक. |

| अ. क्र. | गुणवत्ता क्रमांक | अधिका-याचे नाव | प्रवर्ग | वाटप केलेला महसूल विभाग | पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|---|---|
| **१.** | **२.** | **३.** | **४.** | **५.** | **६.** |
| २४ | ११९ | डॉ. महाजन धनंजय नारायणराव | खुला | औरंगाबाद विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालपसचि, कन्नड, जि. औरंगाबाद |
| २५ | १२३ | डॉ.शिंदे श्रीधर गुणंवतराव | खुला | औरंगाबाद विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, तालपसचि, औसा, जि. लातूर |
| २६ | १२४ | डॉ.पवार प्रविण कौतिक | खुला | पुणे विभाग | सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, कार्यालय सातारा, जि.सातारा. |

२. सदर नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांचा परिविक्षा कालावधी २ वर्षांचा राहील. सदर उमेदवारांची पहिली वेतनवाढ त्यांचा १ वर्षाचा परिविक्षा कालावधी पूर्ण झाल्यानंतर व त्यानंतरची वेतनवाढ त्यांनी परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर देण्यात येईल.

३. वरील उमेदवारांची सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र पशुसंवर्धन सेवा गट-अ मधील नियुक्ती ही २ वर्षांचा परिविक्षाधीन काळ समाधानकारकरित्या पूर्ण करण्याच्या व खालील विहित शर्तींच्या अधीन असेल.

१. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ-नागपूर यांच्या दि. ०६/१/२०१७ च्या आदेशानुसार उपरोक्त नियुक्त अधिका-यांची सेवाजेष्ठता ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांचे पत्र क्र. १८६(१)(२)(४३)/१७५१/पंधरा-अ, दि.१७ जून, २०१७ नुसार सादर केलेल्या निवड यादीतील त्यांच्या गुणानुक्रमानुसार राहील. मात्र सदर उमेदवार हे त्यांच्या मागील काळातील पगार व भत्ते मिळण्यासाठी पात्र असणार नाहीत.
२. वरील उमेदवारांनी त्याच्या नियुक्तीच्या पदावर नियुक्तीच्या आदेशाच्या दिनांकापासून ०१ महिन्याच्या आत रुजू व्हावयाचे आहे. काही अपरिहार्य कारणास्तव त्यांना रुजू होण्यास मुदतवाढ हवी असल्यास तशी मुदतवाढ घेणे आवश्यक आहे. अन्यथा, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या गुणानुक्रमानुसार त्यांना ज्येष्ठता मिळणार नाही व ते हजर होतील त्या दिनांकापासून त्याची ज्येष्ठता धरण्यात येईल. नियुक्तीच्या ठिकाणी विहीत कालावधीत हजर न झालेल्या उमेदवारांची निवड रद्द करण्याची कार्यवाही शासनस्तरावर करण्यात येईल.
३. वरील यादीतील उमेदवाराच्या मागील ०५ वर्षातील वास्तव्य कालावधी संदर्भातील चारित्र्य व पुर्वचारित्र्य पडताळणी आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-०७ यांचे मार्फत करण्याच्या अटींच्या अधिन राहून त्यांना तात्पुरती पदस्थापना देण्यात येत आहे. अशा उमेदवारांचे संबंधित पोलीस यंत्रणेकडून चारित्र्य पडताळणीबाबतचे अहवाल प्राप्त झाल्यानंतर ज्या उमेदवारांबाबतचे चारित्र्य व पुर्वचारित्र्य पडताळणी अहवाल असमाधानकारक असतील त्या उमेदवारांच्या नेमणुका ०१ महिन्याची नोटीस देऊन संपुष्टात आणण्यात येतील.
४. वरीलप्रमाणे नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांनी सेवा प्रवेश नियमानुसार विभागामार्फत आयोजित केल्या जाणाऱ्या विभागीय परीक्षा, प्रादेशिक भाषा परीक्षा, संगणक परीक्षा विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक राहील. तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात येणारी विभागीय लेखा परीक्षा

तसेच विभागाअंतर्गत वेळोवेळी विहीत नियमानुसार आयोजित करण्यात येणाऱ्या इतर परीक्षा परिविक्षा कालावधीच्या ०२ वर्षाच्या विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

५. परिविक्षाधीन अधिकाऱ्यांने कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा विहीत विभागीय लेखा परीक्षा परिविक्षा कालावधीत उत्तीर्ण न केल्यास अथवा त्याची वर्तणुक अयोग्य, संशयास्पद आढळल्यास तो /ती कोणतीही पूर्वसूचना न देता सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

६. उपरोक्त उमेदवार त्यांच्या सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असेल त्यांनी शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र.एन आर व्ही १०७७/१२ दि.२०.५.१९७७ मधील तरतूदीनुसार शासनाला किमान ०१ (एक) महिन्याची आगाऊ नोटीस देणे आवश्यक राहील. शासनास या उमेदवारांची सेवा समाप्त करावयाची असेल त्यावेळी अशी एक महिन्याची आगाऊ नोटीस दिली जाईल. मात्र गैरशिस्त, सेवानियमाचा भंग इ. कारणासाठी सेवा समाप्त करतांना वरील उमेदवारांला नोटीस देण्याचे शासनास बंधन राहणार नाही. हे नोटीशीचे नियम या नंतर वेळोवेळी होणाऱ्या नियमांतील बदलाच्या अधिन राहतील.

७. शासन निर्णय वित्त विभाग क्र.अनियो-१००५/१२६/सेवा-४, दि.३१.१०.२००५ मधील तरतूदीनुसार दि.०१ नोव्हेंबर,२००५ रोजी किंवा त्यानंतर ज्या अधिकारी/कर्मचारी यांची शासकीय सेवेत नियुक्ती होते त्यांना नविन परिभाषीत अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल. सध्या अस्तित्वात असलेली निवृत्ती वेतन योजना (म्हणजेच महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४ आणि सध्या अस्तित्वात असलेली सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरणार नाही. मात्र उपरोक्त उमेदवारांपैकी जे शासकीय कर्मचारी ०१ नोव्हेंबर २००५ पुर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असतील त्यांना शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अनियो-१००६/८७/सेवा-४, दि. १२.१.२००७ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पुर्ततेच्या अधिन राहून महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू राहतील.

८. सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, गट-अ या संवर्गात शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांपैकी जे उमेदवार शासन सेवेत आहेत अशा उमेदवारांचे गोपनीय अभिलेख नियुक्ती पूर्वी तपासण्याबाबत आयोगाने दिलेल्या सूचनेच्या अनुषंगाने शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांनी त्यांचे गोपनिय अहवाल १ महिन्याच्या आत आयुक्त, पशुसंवर्धन यांचेकडे जमा करावे. सदर गोपनीय अहवालाच्या तपासनीच्या अधिन राहून सदर उमेदवारांना नियुक्ती देण्यात येत आहे.

९. वरील सर्व उमेदवारांच्या खालील मूळ प्रमाणपत्रांची तपासणी आयुक्त पशुसंवर्धन, म.रा.पुणे यांनी तपासणी करावी व सदर कागदपत्रे संपूर्णपणे समाधानकारक असल्याची खातरजमा झाल्यानंतरच संबंधित उमेदवारांना हजर करुन घेण्याबाबतचे निर्देश संबंधित कार्यालय प्रमुखांना देण्यात यावेत व त्यानंतरच संबंधित कार्यालय प्रमुखांनी उमेदवारांना रुजू करुन घ्यावे. त्यासाठी संबंधित सर्व उमेदवारांनी त्यांच्याकडील मूळ प्रमाणपत्रासह आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-७ या कार्यालयाशी संपर्क साधावा.

१. जात वैधता प्रमाणपत्र.
२. नॉन क्रिमिलेअर प्रमाणपत्र (लागू असल्यास)
३. वैद्यकीय पात्रता प्रमाणपत्र.
४. शाळा सोडल्याचा दाखला.
५. एस.एस.सी.प्रमाणपत्र.
६. एच.एच.सी.प्रमाणपत्र.
७. बी.व्ही.एससी प्रमाणपत्र/एमव्हीएससी प्रमाणपत्र.

१०. ज्या उमेदवारांना रंगदृष्टीदोष (Colour Blindness) आढळून आला असेल अशा उमेदवारांच्या बाबतीत त्यांचे रंगदृष्टीदोषाबाबत पुन्हा तपासणी करुन घेऊन हे उमेदवार सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, गट-अ या पदावर कामकरण्यास वैद्यकीयदृष्टया पात्र होतो किंवा कसे याची खात्री करण्यात यावी. तसेच त्यांना अंतिम वैद्यकीय प्रमाणपत्र प्राप्त झाल्या शिवाय नियुक्ती देण्यात येऊ नये.

११. वरीलपैकी उमेदवार सेवेत हजर होतील त्यांचे बाबतचा अहवाल आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-७ यांनी शासनास तात्काळ सादर करावा.

१२. वरील उमेदवार ज्या दिवशी झाल्यानंतर त्या दिनांकापासून नियमाप्रमाणे त्यांचे गोपनीय अहवाल लिहीण्यात येतील व बदली झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांकडे पाठविण्यात यावेत.

१३ वरील नियुक्त्या या महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिलेली जाहीरात क्र.१०१/२००९ व त्यानुषंगाने महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१८६(१)(२)(४३)/१७८१/पंधरा-अ, दि.२६/७/२०१२ व पत्र क्र. १८६(१)(२)(४३)/१७५१/पंधरा-अ, दि.१७ जून, २०१७ च्या अनुषंगाने मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल मूळ अर्ज क्र. ७०४/२०१७ (डॉ. निता गोडबोले), मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ-औरंगाबाद येथे दाखल मूळ अर्ज क्र. ४९३/२०१७ (डॉ. संजय खाचणे) तसेच प्रस्तुत पद भरती संदर्भात मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ-औरंगाबाद येथील मूळ अर्ज क्र.४१०/२०१२ (श्री. ए. पी. सरकटे) तसेच या प्रकरणी विविध न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या याचिकांच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहेत. मा.न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार उमेदवारांची नियुक्ती सुरु ठेवणे अथवा गुणवत्ता क्रमांकामध्ये बदल होण्याच्या अधीन सदर नियुक्त्या करण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८०८२९१५३२०४३००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Kiran V Kurundkar

Digitally signed by Kiran V Kurundkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f89b7a82db2238fb7337a9a9b8e00b9c1a35b509d1f6850ddcc783bdb12090f, cn=Kiran V Kurundkar
Date: 2018.08.29 15:33:23 +05'30'

**( किरण कुरुंदकर )**
सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव,
३. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४. मा.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्रासह)
५. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे. (०५ प्रतीसह)
६. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर
७. सहआयुक्त पशुसंवर्धन (मुख्यालय) पुणे.
८. सर्व प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त.
९. सहआयुक्त पशुसंवर्धन, पशुजैव पदार्थ निर्मिती संस्था, औध,पुणे.
१०. सहआयुक्त पशुसंवर्धन, रोग अन्वेषण विभाग, पुणे.
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास महामंडळ, अकोला.
१२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद.
१३. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त

१४. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद,
१५. महालेखापाल/महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) /(लेखा परीक्षा)मुंबई/ नागपूर
१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१७. संबंधित अधिकारी मार्फत आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य,पुणे -६७
१८. निवड नस्ती (पदुम-१).